**धर्मादाय उप आयुक्त , जळगांव यांना कार्यालय प्रमुख व आहरण व संवितरण अधिकारी घोषित करणेबाबत..**

# महाराष्ट्र शासन

## विधि व न्याय विभाग

**शासन निर्णय क्रमांकः सीएचए २०१७/प्र.क्र.१३३/का.१**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.

**दिनांक : २५.११.२०१९.**

**वाचा -**

१ धर्मादाय आयुक्त कार्यालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे पत्र क्र. आस्था/DDO/४८३३/१९, दिनांक ०४.१०.२०१९.

२ धर्मादाय उप आयुक्त, जळगांव यांचे कार्यालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे पत्र क्र. जा.क्र./३४२२/२०१९, दिनांक १७.०९.२०१९.

**प्रस्तावना -**

उपरोक्त संदर्भाधीन अ.क्र. १ येथील पत्रान्वये धर्मादाय आयुक्त कार्यालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांनी केलेल्या विनंतीस अनुलक्षून धर्मादाय उप आयुक्त, जळगांव यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय-**

सार्वजनिक न्यास नोंदणी कार्यालय, जळगांव या कार्यालयासाठी महाराष्ट्र कोषागार नियम,१९६८ मधील नियम क्रमांक १५(३) व १५६ अन्वये, धर्मादाय उप आयुक्त, जळगांव यांना "कार्यालय प्रमुख" तसेच, "आहरण व संवितरण अधिकारी" म्हणून याद्वारे घोषित करण्यात येत आहे. सदर आदेश वित्तिय बाबींपुरतेच मर्यादीत राहतील.

२. सदर शासन निर्णय, वित्त विभाग क्रमांक.विअप्र २०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम, भाग २, दिनांक १७.०४.२०१५ सोबतच्या वित्तिय अधिकार नियमपुस्तिका १९७८ च्या भाग पहिला, उप विभाग एक, अनुक्रमांक तीन येथे नमूद नियम क्रमांक २ अन्वये प्रशासनिक विभागांस प्रदान करण्यास आलेल्या अधिकारांचा वापर करुन निर्गमित करण्यात येत आहे.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१९११२५१५५२४६४२१२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Digitally signed by Mahendra Shantaram Pujari
Date: 2019.11.25 16:01:02 +05'30'

**( महेंद्र पुजारी )**
**कार्यासन अधिकारी,महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा. मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य यांचे प्रधान सचिव,
२. मा. राज्यमंत्री (विधि व न्याय विभाग) यांचे खाजगी सचिव,
३. मा. महाप्रबंधक, उच्च न्यायालय, मुंबई (पत्रान्वये) ,
४. महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता )-१/२, महाराष्ट्र राज्य,मुंबई/नागपूर ,
५. महालेखापाल, (लेखा परीक्षा)-१/२, महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर,
६. सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग,मुबई (पत्रान्वये),
७. धर्मादाय आयुक्त, महाराष्ट्र राज्य,मुंबई,
८. जिल्हा कोषागार अधिकारी जळगाव,
९. धर्मादाय सहआयुक्त, नाशिक,
१०. लेखासंचालक , धर्मादाय आयुक्त कार्यालय, वरळी, मुंबई,
११. सहायक धर्मादाय आयुक्त, जळगांव,
१२. कक्ष अधिकारी (व्यय-५ / आ.पु.क.), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई,
१३. कक्ष अधिकारी का.१५/१७/२३/२४/२५, विधि व न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई,
१४. निवडनस्ती (का.१)